महाराष्ट्र - कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्ती वेतन व इतर आर्थिक लाभ.....
वित्तीय वर्ष २०१४-२०१५ मधील डिसेंबर,२०१४ ते मार्च, २०१५ या महिन्यांकरिता अनुदानाचे वाटप

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : बियुडी-१८१४/१२७/प्र.क्र.४१/२०१४/३६**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०४ फेब्रुवारी, २०१५

संदर्भ :-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.मकसी-१००९/२१९/प्र.क्र.०६/२००९/३६, दि.२८/०८/२००९.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.मकसी-१०१०/प्र.क्र.९१/२०१०/३६, दि.२९/०३/२०११.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.बीयुडी-१०१४/प्र.क्र.९१/२०१४/२५, दि.०९/०४/२०१४.
४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.बियुडी-१८१४/१२७/प्र.क्र.४१/२०१४/३६ दि.२३/०४/२०१४.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.०१/०७/२०१४.
६) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.बीयुडी-१०१४/प्र.क्र.९१/२०१४/२५, दि.०३/०७/२०१४.
७) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.बियुडी-१८१४/१२७/प्र.क्र.४१/२०१४/३६ दि.१२/०८/२०१४.
८) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांचे पत्र क्र. सी/कार्या.१के/स्वासैक/कावि-१९५/१९६/२०१३, दि.१३/११/२०१३ तसेच क्र. सी/कार्या.१के/स्वासैक/कावि-२१७/२०१४, दि.०२/१२/२०१४
९) जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचे पत्र क्र. जीईएन-२/सवासैक्र/सु.अंदाज/२०१४, दि.२१/११/२०१४
१०) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०२/०१/२०१५.

शासन परिपत्रक :-

"**मागणी** क्र.ए-५, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम - १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतन - (००) (०३) महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांचे वारसांना निवृत्तीवेतन (२२३५ २४९३)" या लेखाशीर्षाअंतर्गत महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना निवृत्तीवेतन व अन्य आर्थिक लाभ अदा करण्यासाठी सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षात **एकूण रु.१६,२४,०००/- (रुपये सोळा लक्ष चोवीस हजार फक्त)** एवढी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे. त्यापैकी संदर्भ क्र.४ येथील दि.२३/०४/२०१४ च्या शासन परिपत्रकान्वये **एप्रिल,२०१४ ते जुलै,२०१४ या कालावधीचा** खर्च भागविण्याकरीता **रु.४,८७,५००/- (रुपये चार लक्ष सत्याऐंशी हजार पाचशे फक्त)** व संदर्भ क्र.७ येथील दि.१२/०८/२०१४ च्या शासन परिपत्रकान्वये **ऑगस्ट,२०१४ ते नोव्हेंबर,२०१४ या कालावधीचा** खर्च भागविण्याकरीता **रु.४,८५,०००/- (रुपये चार लक्ष पंच्याऐंशी हजार फक्त) अशी एकूण मिळून रु.९,७२,५००/- (रुपये नऊ लक्ष बहात्तर हजार पाचशे फक्त)** इतकी तरतूद संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयांना वितरीत करण्यात आलेली आहे. त्याचा तपशील पुढीलप्रमाणे :-

## तक्ता (अ) दि.२३/०४/२०१४ च्या शासन परिपत्रकान्वये वितरीत तरतूद

| अ. क्र. | जिल्हाधिकारी (लाभार्थ्यांची संख्या) | सन २०१४-१५ एकूण अर्थसंकल्पीय अनुदान (रुपये) | एप्रिल ते जुलै,२०१४ या कालावधीसाठी वितरित केलेला निधी | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | निवृत्तीवेतन ( दरमहा रु.८०००/- प्रत्येकी प्रमाणे ) प्रत्येक महिन्यासाठी वितरीत केलेले अनुदान (रुपये) | निवृत्तीवेतन एप्रिल, २०१४ ते जुलै,२०१४ साठी एकूण वितरीत अनुदान (रुपये) | प्रवासभत्ता (प्रत्येकी रु.५००/- वार्षिक प्रमाणे) (मे, २०१४ मध्ये उपलब्ध) (रुपये) | एकूण वितरीत अनुदान (रुपये) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | मुंबई शहर (३) | -- | २४,००० | ९६,००० | १५०० | ९७,५०० |
| २ | कोल्हापूर (१०) | -- | ८०,००० | ३,२०,००० | ५००० | ३,२५,००० |
| ३ | पुणे (१) | -- | ८,००० | ३२,००० | ५०० | ३२,५०० |
| ४ | रत्नागिरी (१) | -- | ८,००० | ३२,००० | ५०० | ३२,५०० |
| एकूण अनुदान | | **१६,२४,०००** | **१,२०,०००** | **४,८०,०००** | **७५००** | **४,८७,५००** |

## तक्ता (ब) दि.१२/०८/२०१४ च्या शासन परिपत्रकान्वये वितरीत तरतूद

| अ. क्र. | जिल्हाधिकारी (लाभार्थ्यांची संख्या) | सन २०१४-१५ एकूण अर्थसंकल्पीय अनुदान (रुपये) | ऑगस्ट,२०१४ ते नोव्हेंबर, २०१४ या कालावधीसाठी वितरित केलेला निधी | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | निवृत्तीवेतन ( दरमहा रु.८०००/- प्रत्येकी प्रमाणे ) प्रत्येक महिन्यासाठी वितरीत केलेले अनुदान (रुपये) | निवृत्तीवेतन ऑगस्ट,२०१४ ते नोव्हेंबर,२०१४ साठी एकूण वितरीत अनुदान (रुपये) | इतर आर्थिक लाभ (प्रत्येकी रु.५०००/- वार्षिक ) (सप्टेंबर, २०१४ मध्ये उपलब्ध) (रुपये) | एकूण वितरीत अनुदान (रुपये) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | मुंबई शहर (३) | --- | २४,००० | ९६,००० | ५००० | १,०१,००० |
| २ | कोल्हापूर (१०) | --- | ८०,००० | ३,२०,००० | --- | ३,२०,००० |
| ३ | पुणे (१) | --- | ८,००० | ३२,००० | --- | ३२,००० |
| ४ | रत्नागिरी (१) | --- | ८,००० | ३२,००० | --- | ३२,००० |
| एकूण अनुदान | | **१६,२४,०००** | **१,२०,०००** | **४,८०,०००** | **५०००** | **४,८५,०००** |

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०२/०१/२०१५ च्या परिपत्रकान्वये सन २०१४-१५ साठीचे अनुदान आता **१००%** उपलब्ध करुन देण्यात आले आहे. सबब, महाराष्ट्र-कर्नाटक सीमा आंदोलनातील हुतात्म्यांच्या वारसांना **दि.०१ डिसेंबर, २०१४ ते दि.३१ मार्च, २०१५** या कालावधीचे निवृत्तीवेतन व इतर आर्थिक लाभ अदा करण्यासाठी खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे **रु.६,४६,९००/- (रुपये सहा लक्ष सेहेचाळीस हजार नऊशे फक्त)** इतके अनुदान संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयांना वितरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हाधिकारी (लाभार्थ्यांची संख्या) | यापूर्वी वितरीत केलेले एकूण अनुदान (तक्ता अ / ब मधील स्तंभ ७ ची बेरीज) (रुपये) | ०१ डिसेंबर, २०१४ ते ३१ मार्च, २०१५ या कालावधीसाठी वितरित केलेला निधी | | | | सन २०१४-१५ मध्ये एकूण वितरीत अनुदान (स्तंभ ३ + ७) (रुपये) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | निवृत्तीवेतन ( दरमहा रु.८०००/- प्रत्येकी प्रमाणे ) ०१ डिसेंबर, २०१४ ते ३१ मार्च, २०१५ साठी एकूण वितरीत अनुदान (रुपये) | इतर आर्थिक लाभ (प्रत्येकी रु.५०००/- वार्षिक ) (रुपये) | श्रीमती अश्विनी ठाकूर यांना अदा करावयाची ऑगस्ट, २००९ ते मार्च, २०१२ या कालावधीतील निवृत्तीवेतना-च्या फरकाची रक्कम (रुपये) (फेब्रु., २०१५ मध्ये उपलब्ध) | एकूण वितरीत अनुदान (रुपये) | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | मुंबई शहर (३) | १,९८,५०० | ९६,००० | ५००० | १,१६,९०० | २,१७,९०० | ४,१६,४०० |
| २ | कोल्हापूर (१०) | ६,४५,००० | ३,२०,००० | ३५,००० | --- | ३,५५,००० | १०,००,००० |
| ३ | पुणे (१) | ६४,५०० | ३२,००० | ५००० | --- | ३७,००० | १,०१,५०० |
| ४ | रत्नागिरी (१) | ६४,५०० | ३२,००० | ५००० | --- | ३७,००० | १,०१,५०० |
| **एकूण अनुदान** | | **९,७२,५००** | **४,८०,०००** | **५०,०००** | **१,१६,९००** | **६,४६,९००** | **१६,१९,४००** |

**३. जिल्हाधिकारी, मुंबई / मुंबई उपनगर यांना याद्वारे सूचित करण्यात येते की, त्यांचे संदर्भाधीन पत्रास अनुसरुन वितरीत करण्यात आलेली निवृत्तीवेतन फरकाची रक्कम रु.१,१६,९००/- ही श्रीमती अश्विनी बा. ठाकूर यांना त्वरीत अदा करुन त्याबाबतचा अहवाल स्वतंत्रपणे शासनास सादर करण्यात यावा.**

४. वरीलप्रमाणे मंजूर केलेले अनुदान पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे, याची कृपया नोंद घ्यावी :-

१) **दि.०१ डिसेंबर, २०१४ ते दि.३१ मार्च, २०१५** या कालावधीतील खर्च संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांना वितरीत केलेल्या तरतूदीइतका मर्यादित ठेवावा.

२) संबंधित जिल्हाधिकारी यांनी उक्त बाबीवर होणाऱ्या खर्चाची वेगळी नोंद ठेवून महालेखापाल कार्यालयामधील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घालून त्याचे विवरणपत्र सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५ व वित्त विभाग यांच्याकडे विहित मुदतीत पाठवावे व त्याची प्रत या कार्यासनास देखिल पाठवावी. कुठल्याही परिस्थितीत २२३५२४९३ या लेखाशीर्षाखालीच रकमा खर्ची पडत असल्याची व त्याबाबत खर्चमेळाद्वारे खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील, याची कृपया नोंद घ्यावी.

५. हे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०२/०१/२०१५ मधील सूचना विचारात घेवून निर्गमित करण्यात येत आहे.

६. हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०२०४१२४२५८१३०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAIKH RIYAJUDDIN I

Digitally signed by SHAIKH RIYAJUDDIN I
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SHAIKH RIYAJUDDIN I
Date: 2015.02.04 12:53:07 +05'30'

**( रि.इ.शेख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी रवाना :-

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र- १, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र- १, मुंबई.
३. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा), मुंबई.
४. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव, लेखा व कोषागारे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. जिल्हाधिकारी, मुंबई शहर जिल्हा, जुने जकात गृह, फोर्ट, मुंबई-२३.
७. जिल्हाधिकारी, कोल्हापूर.
८. जिल्हाधिकारी, पुणे.
९. जिल्हाधिकारी, रत्नागिरी.
१०. जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१ यांना असे कळविण्यात येते की, आवश्यक अनुदान जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्याकडून मागविण्यात यावे.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर / पुणे / रत्नागिरी.
१४. श्रीमती अश्विनी बा. ठाकूर, सहारा को-ऑ. हौ.सोसायटी, ए-५, परांजपे कॉलनी, नारंगी फाटा, विरार (पूर्व), जि.पालघर.
१५. सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती (कार्या.३६).